जल जीवन मिशन अंतर्गत राज्य व जिल्हा स्तरावर कार्यरत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करणेबाबत.

(२२१५ ९९७१, ३६-सहायक अनुदाने (वेतन))

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः जजीमि-२०२५/प्र.क्र.७५/पापु-१०
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४०० ००१.
तारीख: १५ एप्रिल, २०२५

वाचा -

१) अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, नवी मुंबई यांचे पत्र क्र. रापास्वमि- ०४२४/प्रति. नि./वेतन/प्र.क्र.०२/लेखा/२०२४/५६७ दिनांक १३/०३/२०२५

२) लेखाधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, नवी मुंबई यांचे पत्र क्र. रापास्वमि- ०४२४/प्रति. नि./वेतन/प्र.क्र.०२/लेखा/२०२४/८६५ दिनांक ०७/०४/२०२५

प्रस्तावना

सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षात जल जीवन मिशन अंतर्गत राज्य व जिल्हा स्तरावर कार्यरत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी “मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२९) जल जीवन अभियान सहाय्यिकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय्य (राज्य हिस्सा ४०%)(कार्यक्रम) (२२१५ ९९७१)” या लेखाशिर्षांतर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली रू. २५.०० कोटी फक्त इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आली आहे. सद्यस्थितीत वाचा क्र. १ येथील पत्रान्वये माहे- मार्च २०२५ ते ऑगस्ट २०२५ अशा कालावधीकरिता वेतन व भत्ते यावरील खर्चाकरिता रु. १०.०० फक्त कोटी इतका निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. सद्यस्थितीत रू. २.२५ कोटी फक्त इतका निधी बीम्सवर प्रणालीवर वित्त विभागाने उपलब्ध करुन दिला आहे. सदर बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेले रु. २.२५ कोटी फक्त इतका निधी जल जीवन मिशन अंतर्गत राज्य व जिल्हा स्तरावर कार्यरत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यावरील चालू आर्थिक वर्षातील पुढील कालावधीचा खर्च भागविण्यासाठी अभियान संचालक, जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांना अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणाली (बीम्स प्रणाली) द्वारे उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षात जल जीवन मिशन अंतर्गत राज्य व जिल्हा स्तरावर कार्यरत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यावरील पुढील कालावधीचा खर्च भागविण्यासाठी रू. २.२५ कोटी फक्त (अक्षरी रूपये दोन कोटी, पंचवीस लक्ष फक्त) इतके अनुदान

मिशन संचालक, जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांना या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

०२. जल जीवन मिशन अंतर्गत राज्य व जिल्हा स्तरावर कार्यरत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते याकरीता उक्त लेखशीर्षाखाली अनुदान वितरित करतेवेळी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियम/ सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

०३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७/०४/२०२५ मधील तरतूदीचे कटाक्षाने पालन करावे. तसेच वित्त विभागाकडून वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या निर्देशानुसार प्रत्यक्ष खर्चाबाबत कार्यवाही करावी.

०४. सदरचा खर्च "मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२९) जल जीवन अभियान सहाय्यिकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय्य (राज्य हिस्सा ४०%)(कार्यक्रम) (२२१५ ९९७१)" या लेखाशिर्षातर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली दर्शविण्यात यावा.

०५. सदर सहायक अनुदान वेतनासाठी असल्याने वित्त विभागाच्या दिनांक १२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार ते "बिनशर्त" स्वरुपाचे आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१५१५३०४२७२२८असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे मा. राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT SURYAKANT SHIRKE

Digitally signed by PRASHANT SURYAKANT SHIRKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=28d674b5cf0d02c0cca441170526b8db083bc682fcc0678221d8b71cbce1fe9d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C45F39D3CA3AACD7044A3EF765881D5C2BFF1E8DB64132C7D1D5A1BED6DE768, cn=PRASHANT SURYAKANT SHIRKE
Date: 2025.04.15 15:46:38 +05'30'

(प्रशांत सुर्यकांत शिर्के)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अभियान संचालक, जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर

३. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व

४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

६. निवडनस्ती (कार्यासन पापु-१०)